**श्री.रमेश पंढरीनाथ गायकवाड या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यास शैक्षणिक संशोधन डाटा सर्वेक्षणकरिता परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत एक विशेष बाब म्हणून आर्थिक सहाय्य मंजुर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पशिशि-२०१४/प्र.क्र.१००/का-१२
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २५ ऑगस्ट,२०१४.

**वाचा :**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.आदिशि-१२०३/प्र.क्र.७६/का-१२, दि.३१.०५.२००५.

२) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०१४-प्र.क्र.०५/का-६(६), दि.३०.०४.२०१४.

**प्रस्तावना :**

राज्यातील मागासवर्ग गटामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाच्या संणी उपलब्ध होत नाहीत. या विद्यार्थ्यांमध्ये गुणवत्ता असून देखील आर्थिक परिस्थितीमुळे त्यांना उच्च शिक्षणापासून वंचीत रहावे लागते. अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना परदेशातील शिक्षणाची संधी मिळावी व त्यांच्या गुणवत्तेला वाव मिळावा म्हणून परदेशातील विद्यापीठामध्ये विविध अभ्यासक्रमासाठी ज्या आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल अशा एकूण १० विद्यार्थ्यांना परदेशातील शिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी अनुदान म्हणून शिष्यवृत्ती मंजुर करण्यास संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

श्री.रमेश पंढरीनाथ गायकवाड हे अनुसूचित जमाती प्रवर्गातील असून सध्या जवाहरलाल नेहरू विश्वविद्यालय, नवी दिल्ली येथे पी.एच.डी. करित आहेत. सन २००४-०५ ते २००६-०७ या कालावधीत सदर विद्यार्थ्यास शासकीय संशोधन अधिछात्र (M.Phil/Ph.D.) या अभ्यासक्रमासाठी लाभ मंजुर करण्यात आल्याचे शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविले आहे. Geopolitical Consequences of occupation: A case study of Iraq या विषयाचे संशोधन करण्याकरिता सदर विद्यार्थ्यास युनायटेड नेशन्स हेडक्वार्टर्स लायब्ररी, न्युयॉर्क सिटी (यु.एस.ए.) येथे ६ महिन्यांसाठी जावयाचे असल्याने विदेशात वरील संशोधन (अभ्यासदौरा) करण्यासाठी आर्थिक सहाय्य मंजुरीबाबतचे आदेश देण्याबाबत आयुक्त, आदिवासी विकास यांनी संदर्भ क्र.२ वरील पत्रान्वये विनंती केलेली आहे.

अनुसूचित जमातीच्या मुला-मुलींना उच्च शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत शैक्षणिक सहलीची तरतूद नाही, ही बाब विचारात घेता एक विशेष बाब म्हणून परदेशात परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत शैक्षणिक सहलीस मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

श्री.रमेश पंढरीनाथ गायकवाड यांना Geopolitical Consequences of occupation: A case study of Iraq या विषयाचे संशोधन करण्याकरिता युनायटेड नेशन्स हेडक्वार्टर्स लायब्ररी, न्युयॉर्क सिटी (यु.एस.ए.) येथे ६ महिन्यांकरिता अमेरिकेत निवास, भोजन व प्रवास याकरिता एकूण ४९,६०० US$ इतक्या खर्चास एक खास बाब म्हणून परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत शैक्षणिक सहलीस शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदरहू विद्यार्थ्यास उपरोक्त शैक्षणिक सहलीसाठी येणारा खर्च प्रदान करण्याकरिता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. या बाबीकरिता होणारा खर्च "२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, राज्य योजनांतर्गत योजना, (०२)(२३) आदिवासी विद्यार्थ्यांसाठी परदेशातील उच्च शिक्षणाकरिता शैक्षणिक शिष्यवृत्त्या (२२२५ ४०९८), ३४ शिष्यवृत्त्या व विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली घालून त्याखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मंजुर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१२३८३२९६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sadanand Nurya Gavit

Digitally signed by Sadanand Nurya Gavit
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sadanand Nurya Gavit
Date: 2014.08.27 12:34:21 +05'30'

**(स. नु. गावीत)**
**शासनाचे सह सचिव**

प्रत,

१. मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
६. महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. निवड नस्ती, का-१२.